हतनूर, ता.भुसावळ, जि. जळगांव या प्रकल्पांतर्गत हतनूर उजवा कालव्यावरील धुपे- २ व अनावर्डे वितरीका व त्याअंतर्गतच्या उपवितरिका, लघुवितरिका यांचे विशेष दुरुस्ती कामांना प्रशासकीय मान्यता

.

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग,

शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२१/ (प्र.क्र.१७४/२०२१)/ सिंव्य(कामे)

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक: १४/ ०३/ २०२४

**वाचा :-**

१. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ जळगांव यांचे पत्र.जा.क्र. तापाविम-/ प्रशा -४-/ ४३३६/ २०२३/ दि. १८/०९/२०२३.
२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य (कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/५५१/१७/सिंव्य (कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे) दि. १/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा- २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे), दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र-प्रमा २०१३/(७८५/१३)/ सिंव्य (कामे), दि १/१/२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे) दिनांक १४/०३/२०२३.

**प्रस्तावना :-**

हतनुर ता. भुसावळ जि. जळगांव येथे तापी नदी वर सन १९७१ मध्ये धरणाचे काम सुरू झाले, धरण अजुन बांधकाम अवस्थेत आहे. टप्पा क्रमांक - १ चे काम सन १९८२ मध्ये पुर्ण झाले असुन, टप्पा क्रमांक-२ निर्माणाधीन अवस्थेत आहे. उर्ध्व तापी (हतनुर) प्रकल्प ता.भुसावळ जि. जळगांव हा संवर्ग-१ प्रकारातील प्रकल्प आहे. सदर प्रकल्प तापी नदी वर टहाकळी गावाजवळ असुन सावदा मुक्ताईनगर रस्त्यावर आहे.सदरचा प्रकल्प हा तापी खो-यात आहे. सदरचा प्रकल्प हा मातीधरण व दगडी सांडवा असे दोन भागात धरणाचे बांधकाम पुर्ण करण्यात आलेले आहे. तसेच टप्पा-१ मधील कालव्याची लांबी ९४ कि.मी असुन वहन क्षमता ३५.५४ क्युमेक्स आहे, तर टप्पा-२ चे बांधकाम अपुर्ण आहे. सदर प्रकल्पाची एकुण साठवण क्षमता ३८८ दलघमी असुन सिंचन क्षमता ५३३५१ हेक्टर आहे. सदर प्रकल्पाच्या कालव्याचे बांधकाम पुर्ण होवून ३६ वर्षे झाले आहेत. कालपरत्वे व इतर करणास्तव कालव्याचे अस्तरीकरण व काही बांधकामांचे भाग व माती काम जीर्ण झाले असल्याने कालव्याची दुरुस्ती करणे आवश्यक आहे

प्रस्तावित कामांमुळे पाणीवपर संस्थाना वितरीका /उपवितरीका हस्तांतरण करणे सुलभ होणार आहे. हतनुर उजवा कालव्यावरील धुपे २ व अनावर्डे वितरिका आणि या वितरीकांवरील उपवितरिका,लघुवितरिका यांचे प्रकल्पिय सिंचन क्षेत्र १६६४ हेक्टर असुन सद्यस्थितीत २१० हेक्टर प्रत्यक्ष सिंचन होत आहे. सदर दुरुस्ती कामामुळे अंदाजे १४५० हेक्टर सिंचनक्षेत्र पुनर्स्थापित होणार आहे व कालव्याच्या वहन क्षमतेत सुद्धा वाढ होणार आहे.

या पार्श्वभूमीवर हतनूर, ता.भुसावळ, जि. जळगांव या प्रकल्पांतर्गत हतनूर उजवा कालव्यावरील धुपे- २ व अनावर्डे वितरीका व त्याअंतर्गतच्या उपवितरिका व लघुवितरिकांच्या दुरुस्तीचे अंदाजपत्रकास विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानूसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

हतनूर, ता.भुसावळ, जि. जळगांव या प्रकल्पांतर्गत हतनूर उजवा कालवा धुपे- २ व अनावर्डे वितरीका व त्या वरील उपवितरिका, लघुवितरिका यांचे दुरुस्तीचे अंदाजपत्रकास विशेष दुरुस्ती अंतर्गत रु. ४,७६,४४,३३७ (चार कोटी, श्याहत्तर लक्ष, चौवेचाळीस हजार, तीनशे सदोतीस फक्त) एवढ्या खर्चाचा प्रस्तावास खालील अटीच्या अधीन राहून सोबत च्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१) तांत्रिक मान्यता, निविदा प्रक्रिया, कामाचे नियोजन व पूर्णत्व, प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय/ परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

४) सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत यापुर्वी स्थापित पाणी वापर संस्थाकडे लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपुर्ण जबाबदारी क्षेत्रिय अधिका-यांची राहील.

५) प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

६) प्रस्तावित दुरस्तीकामांद्वारे अंदाजे १४५० हेक्टर सिंचन क्षेत्र पुनर्स्थापित करण्याची जबाबदारी क्षेत्रिय अधिकारी यांची राहील.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०० मोठे पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती/विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (०४) (०४) तापी पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४७०० ०२५६) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र.५८ सन २०२३-२४ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०३१४१५३७२६०८२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.03.14 15:47:18 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
**शासनाच्या उपसचिव**

**सोबत :- सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३) मा.उपमुख्यमंत्री (जलसंपदा/वित्त) यांचे प्रधान सचिव,

४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.

५) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.

६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.

७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.

८) अ.मु.स. (वित्त) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

९) अ.मु.स. (नियोजन) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१०) अमुस (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

११) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१२) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,

१४) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१५) कार्यकारी संचालक,तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,

१६) मुख्य अभियंता , तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,

१७) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.

१८) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगांव,

१९) कार्यकारी अभियंता, जळगांव पाटबंधारे विभाग ,जळगांव,

२०) सिं.व्य (कामे) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२१/ (प्र.क्र.१७४/२०२१)/ सिंव्य (कामे),**

**दि १४ / ३ / २०२४ चे सहपत्र**

| **Sr.No** | **Description of Item** | **Amount in Rs** |
|---|---|---|
| 1 | C-Works | |
| a) | Sub-Estimate No.1 - Special Repairs to Dhupe-2 Distributory from Ch 0.00 -3500 of Hatnoor Right Bank Canal. | 3917314 |
| b) | Sub-Estimate No.2 - Special Repairs to Subminor-1 of Dhupe Distributory of Hatnoor Right Bank Canal. | 2583975 |
| c) | Sub-Estimate No.3 - Special Repairs to SubMinor 2,3 and Main Distributory from ch 3500-5100 of Dhupe-2 Distributory of Hatnoor Right Bank Canal. | 2867714 |
| d) | Sub-Estimate No.4- Special Repairs to Anvarde Distributory & its Minor of Hatnoor Right Bank Canal. | 22560825 |
| e) | Sub-Estimate No.5- Constructing & Fixing Cut Throat Flumes for various WUAs on Dhupe-2 Distributory of Hatnoor Right Bank Canal. | 1260609 |
| 2 | Work Portion Cost | 33190437 |
| 3 | Royalty | 7483908 |
| 4 | Total Cost of work (2+3)Including Royalty | 40674345 |
| 5 | 1 % Insurance (On Work Portion Only) | 331904 |
| 6 | 18 % GST (On Work Portion) | 5974279 |
| 7 | 2% Contingencies (On Work Portion Only ) | 663809 |
| 8 | **Total** Rs (4+5+6+7) | 47644337 |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.03.14 15:47:38 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
**शासनाच्या उपसचिव**